नागपूर विभागातील तलाठी संवर्गातील अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ या कालावधीत मुदतवाढ देण्यास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.आस्था-२०१८/प्र.क्र.१३०(भाग-६)/ई-१०**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३० सप्टेबर, २०२०

वाचा:-१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.संकीर्ण-१००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि.२०.०३.२००६
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.आस्था-२०१८/प्र.क्र.१३०(भाग-६) /ई-१०, दि.३१.०३.२०२०
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२०
५) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र. मशा-७(२)सं.क्र.१२५/कावि-१०८०/२०१९, दि.२७.०८.२०२०

**प्रास्ताविक:-**

नागपूर विभागातील तलाठी संवर्गाच्या १६७१ पदांचा आकृतीबंध शासन निर्णय क्र.संकीर्ण-१००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि.२०.०३.२००६ अन्वये मंजूर करण्यात आला आहे. या पदांपैकी ४२४ पदे ही अस्थायी असून त्यांना संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय दि.३१.०३.२०२० अन्वये दि.०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली होती. सदरची मुदतवाढ संपुष्टात आली असल्याने वित्त विभागाने त्यांच्या संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णय दि.१२.०२.२०२० अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान केले आहेत. त्यानुषंगाने विभागीय आयुक्त, नागपूर विभाग यांनी नागपूर विभागातील तलाठी संवर्गाच्या ४२४ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

**१.** नागपूर विभागातील तलाठी संवर्गातील अस्थायी पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नव्हते, असे विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रमाणित केलेले आहे. सबब, नागपूर विभागातील तलाठी संवर्गाच्या, पुढील परिशिष्टात दर्शविलेल्या एकूण ४२४ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत चालू ठेवण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

**परिशिष्ट**

**नागपूर विभाग**

| अ.क्र. | जिल्हा | मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे | खर्चाचे लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | नागपूर | ४३४ | ३७१ | ६३ | मागणी क्रमांक सी-१-२०५३-जिल्हा प्रशासन-०९४-इतर आस्थापना-०९४(०३) ग्राम अधिकारी-०९४-(०३)(०५) आयुक्त, नागपूर वेतने (२०५३ ०३५ १०१) |
| २ | वर्धा | २९१ | २७६ | १५ | |
| ३ | भंडारा | २०४ | १२० | ८४ | |
| ४ | गोंदिया | २०३ | ११९ | ८४ | |
| ५ | चंद्रपूर | ३०२ | २१७ | ८५ | |
| ६ | गडचिरोली | २३७ | १४४ | ९३ | |
| | **एकूण** | **१६७१** | **१२४७** | **४२४** | |

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च उपरोक्त परिशिष्टातील स्तंभ क्र. ६ मध्ये नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो संबंधित वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ वरील शासन निर्णयातील तरतुदींप्रमाणे सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता मिळविण्याकरीता आवश्यक ती कार्यवाही करावी.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : पदनि-२०१६ / प्र.क्र.८ /१६/ आ.पु.क., दि. ३१.०८.२०२० अन्वये सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९३०१६५४१४७८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Raghuvir D Katke

Digitally signed by Raghuvir D Katke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f594954bd799968aa50aaa40154cd3ad3a036295890af4cd43ecc9f22dcb87a, serialNumber=c7afd3f6d4faa0e6c98e10d28dc71b935654c783f0397a6cdbefaeb5f6eef9da, cn=Raghuvir D Katke
Date: 2020.09.30 16:55:55 +05'30'

**(र.धों. कटके)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
२) महालेखापाल-१ /२ (लेखा परीक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
३) जिल्हाधिकारी, नागपूर / वर्धा / भंडारा / गोंदिया / चंद्रपूर / गडचिरोली

४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / वर्धा / भंडारा / गोंदिया / चंद्रपूर / गडचिरोली

६) वित्त विभाग ( आ.पु.क. / व्यय-९ कार्यासन), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

७) अवर सचिव (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

८) कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

९) निवड नस्ती (कार्यासन ई-१०), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई